**महाराष्ट्र सुवर्ण महोत्सवी नागरी दलित वस्ती पाणी पुरवठा व स्वच्छता योजनेतंर्गत अनुसूचित जाती व नवबौध्द घटकांमधील कुटुंबियांना वैयक्तिक शौचालय उपलब्ध करुन देण्यासाठी अनुज्ञेय अनुदानापैकी उर्वरित अनुदान वितरीत करणेबाबत.**
**ब्रम्हपुरी नगर परिषद, जि. चंद्रपूर**

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः नादव २०१७/प्र.क्र.०७/पा.पु.२२**
जी.टी. रुग्णालय संकुल, ७ वा मजला,
लोकमान्य टिळक रोड, नवीन मंत्रालय, मुंबई ४००००१.
तारीख: ०६ फेब्रुवारी, २०१७

वाचा :-

**१) शासन निर्णय,पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,क्र : नादव २०१०/प्र.क्र. २१९/पा.पु. २२, दि.२५.६.२०१०**
**२) शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,क्र : नादव २०१०/प्र.क्र. २९६/पा.पु. २२, दि. ४/१/२०११**
**३) शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,क्र. नादव २०१०/प्र.क्र. ५०८/पा.पु. २२, दि.१४/१/२०११**
**४) शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,क्र: नादव २०१२/प्र.क्र.१५५/पा.पु. २२, दि.१६.३.२०१२**

**प्रस्तावना**

महाराष्ट्र राज्याच्या सुवर्ण महोत्सवी वर्षानिमित्त राज्यामध्ये महाराष्ट्र सुजल व निर्मल अभियानांतर्गत राज्याच्या नागरी भागातील अनुसूचित जाती व नवबौध्द घटकांमधील कुटुंबियांना खाजगी नळ जोडण्या व वैयक्तिक शौचालये उपलब्ध करुन देण्याकरिता संदर्भीय दिनांक २५ जून, २०१० च्या शासन निर्णयान्वये नागरी दलित वस्ती पाणी पुरवठा व स्वच्छता योजना राबविण्यात येत आहे. या योजनेंतर्गत नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांनी त्यांच्या शहरातील अनुसूचित जाती व नवबौध्द घटकांमधील कुटुंबियांना खाजगी नळ जोडण्या व वैयक्तिक शौचालय उपलब्ध करुन देण्यासाठी प्रकल्प प्रस्ताव तयार करुन शासनास सादर करताना अनुसरावयाची अतिरिक्त मार्गदर्शक तत्वे दिनांक १४ जानेवारी, २०११ च्या शासन निर्णयान्वये विहीत करण्यात आलेली आहे.

०२. सदर योजनेंतर्गत नागरी भागातील अनुसूचित जाती व नवबौध्द घटकांमधील कुटुंबीयांना खाजगी नळ जोडण्यासाठी रु.४०००/- प्रतिकुटुंब तर वैयक्तिक शौचालय बांधकामासाठी रु. १२०००/- प्रतिकुटुंब अनुज्ञेय आहे. या योजनेअंतर्गत खाजगी नळ जोडण्या व वैयक्तिक शौचालय उपलब्ध करुन देण्यासाठी प्रकल्प प्रस्तावाच्या एकूण किंमतीच्या ९०% शासकीय अनुदान अनुज्ञेय असून १०% रक्कम लाभार्थी किंवा नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेने उपलब्ध करुन द्यावयाची आहे.

०३. महाराष्ट्र सुवर्ण महोत्सवी नागरी दलित वस्ती पाणी पुरवठा व स्वच्छता योजनेतंर्गत शासन निर्णय दिनांक १६.३.२०१२ अन्वये ब्रम्हपुरी नगरपरिषदेतील अनुसूचित जाती व नवबौध्द घटकांमधील कुटुंबियांना वैयक्तिक शौचालय (एकूण ४९१ वै.शौचालये) उपलब्ध करुन देण्याबाबतच्या रुपये ६०.०९ लक्ष किंमतीच्या प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्यात आली असून योजनेस अनुज्ञेय असलेले अनुदान रु.५४.०९ लक्ष पैकी रु.२७.०४ लक्ष अनुदान ब्रम्हपूरी नगर परिषदेस वितरीत करण्यात आले आहे. मुख्याधिकारी, ब्रम्हपुरी नगर परिषद यांनी दि.११.१.२०१७ च्या पत्रान्वये एकूण रुपये २७.०४ लक्ष रक्कमेचे उपयोगिता प्रमाणपत्र सादर केले असुन सदर योजनेंतर्गत वैयक्तिक शौचालय बांधकामातील स्वहिश्श्याचा १०% लाभार्थ्यांचा खर्च हा संबंधित लाभार्थ्याने उचललेला असल्याचे प्रमाणपत्र सादर केले आहे. तसेच सदर योजनेंतर्गत मंजूर ४९१ वैयक्तिक शौचालयांचा कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण विभाग, चंद्रपूर यांनी प्रमाणित केलेला भौतिक प्रगती अहवाल सादर केला असून ( मंजूर ४९१ वैयक्तिक शौचालयांपैकी- ११० पूर्ण, प्रगतीपथावर/बांधकाम अपूर्ण-१८०, बांधकाम सुरु झालेले-२०१) उर्वरित अनुदान वितरीत करण्याची विनंती केली आहे. सदर बाबी विचारात घेऊन ब्रम्हपुरी नगर परिषदेस सदर योजनेंतर्गत अनुज्ञेय अनुदानापैकी उर्वरित अनुदान रु. २७.०५ लक्ष वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती

**शासन निर्णय:-**

महाराष्ट्र सुवर्ण महोत्सवी नागरी दलित वस्ती पाणी पुरवठा व स्वच्छता योजनेतंर्गत, शासन निर्णय, दिनांक १६.३.२०१२ अन्वये मंजूरी देण्यात आलेल्या ब्रम्हपुरी नगर परिषदेतील अनुसूचित जाती व नवबौध्द घटकांमधील कुटुंबियांना वैयक्तिक शौचालय उपलब्ध करुन देण्याबाबतच्या योजनेस अनुज्ञेय असलेल्या अनुदानापैकी उर्वरित अनुदान रु.२७.०५ लक्ष (रुपये सत्तावीस लक्ष पाच हजार फक्त) वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

(रक्कम लाखांत)

| नगर परिषदेचे नाव | योजनेची मंजूर किंमत | राज्य शासनाचे अनुज्ञेय अनुदान (९०%) | नागरी संस्थेचा सहभाग (१०%) | नागरी संस्थेने भरलेली रक्कम | शासनाने यापुर्वी वितरीत केलेले अनुदान | शासनाकडून वितरीत करावयाचे अनुदान |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |
| ब्रम्हपुरी, जि. चंद्रपूर | ६०.०९ | ५४.०९ | ६.०० | (प्रमाणपत्र) | **२७.०४** | **२७.०५** |
| | एकूण | | | | | **२७.०५** |

२. सदर योजनेअंतर्गत नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांना अनुज्ञेय होणाऱ्या सदर अनुदानावरील खर्च "मागणी क्रमांक वाय-२, २२१५, पाणी पुरवठा व स्वच्छता, ०१ पाणी पुरवठा १९२, स्थानिक संस्था, महानगर पालिका/ नगरपरिषदांना सहाय्य - (०२) राज्य योजना - (१२) महानगरपालिका व नगरपालिका यांच्या (स्थानिक संस्था) नागरी भागांतील अनुसूचित जाती व नवबौध्द कुटुंबियांना खाजगी नळ जोडणी व वैयक्तिक शौचालये यासाठी सहायक अनुदान (२२१५ ९३१६), ३१ सहायक अनुदान (वेतनेतर)" या लेखाशिर्षाखाली करण्यात आलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण यांनी सदर लेखाशिर्षाखाली शासनाकडून उपलब्ध करुन दिलेल्या अनुदानातून उक्त विवरणपत्रातील नमूद स्तंभ क्रमांक ७ मध्ये दर्शविल्याप्रमाणे संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेस अनुदान वितरीत करावे, तसेच अनुदानाच्या या वितरणाचे स्वतंत्र लेखे ठेवावेत.

३. संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेने योजनेसाठी स्वतंत्र लेखे ठेवावेत आणि योजनेचा प्रगती अहवाल व उपयोगीता प्रमाणपत्रे नियमितपणे प्रत्येक महिन्याच्या ५ तारखेपर्यंत शासनास सादर करावेत.

४. सदर योजनेंतर्गत शासकीय अनुदान प्राप्त करुन घेण्यासाठी संबंधीत नागरी संस्थेने शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांक : नादव २०१०/प्र.क्र.२१९/पापु-२२; दिनांक २५/६/२०१० व क्रमांक नादव २०१०/ प्र.क्र. ५०८/पा.पु. २२, दिनांक १४/१/२०११ मधील तरतूदीचा अवलंब करणे आवश्यक राहील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक क्रमांक २०१७०२०६११०६२२७८२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Prabhakar L Chakre

Digitally signed by Prabhakar L Chakre
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Desk Officer, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Prabhakar L Chakre
Date: 2017.02.06 16:38:36 +05'30'

**(प्र.ल. चक्रे)**
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. मा.मंत्री (पाणी पुरवठा व स्वच्छता) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,

२. प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई,

३. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई,
४. महालेखापाल-१, मुंबई
५. संचालक, नगरपालिका प्रशासन संचालनालय, मुंबई,
६. विभागीय आयुक्त, नागपूर विभाग , नागपूर
७. जिल्हाधिकारी, चंद्रपूर
८. संचालक (वित्त), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, सिडको भवन, बेलापूर, नवी मुंबई.
९. कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण नागरी व ग्रामीण योजना विभाग,कोल्हापूर
१०. अध्यक्ष / मुख्याधिकारी, ब्रम्हपुरी नगर परिषद, जि. चंद्रपूर
११.जिल्हा कोषागार अधिकारी, चंद्रपूर
१२.जिल्हा प्रकल्प अधिकारी, (नगरपालिका) जिल्हाधिकारी कार्यालय, चंद्रपूर
१३.वित्त विभाग / नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई,
१४. कक्ष अधिकारी, पापु ०४, पापु २०, पापु २४, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय,मुंबई,
१५. निवडनस्ती.